**कामाच्या ठिकाणी महिलांच्या होणा-या लैंगिक छळाच्या तक्रारींची चौकशी करण्यासाठी जिल्हा स्तरावर "स्थानिक तक्रार समित्या" गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मकचौ-२०१४/प्र.क्र.६३/मकक**

नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ११ सप्टेंबर, २०१४.

<u>वाचा :-</u>

१. शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०९९/७३/मकअ, दि.१९ मे, १९९९.
२.शासन परिपत्रक क्र.मकचौ-२००६/प्र.क्र.१०/मकअ, दि.१७ मे, २००६.
३.शासन निर्णय क्र.मकचौ-२००६/प्र.क्र.१५/मकअ, दि.१९ सप्टेंबर, २००६.
४. शासन निर्णय क्र.मकचौ-२०१०/प्र.क्र.४८/मकअ, दि.९/१२/२०१०.
५. शासन शुध्दीपत्रक क्र.मकचौ-२०१२/प्र.क्र.०७/मकअ, दि.१९/३/२०१२.
६. कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम-२०१३ व नियम दि.९.१२.२०१३.

**<u>प्रस्तावना :-</u>** कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम २०१३ व नियम दि. ९.१२.२०१३ रोजी प्रसिध्द करण्यात आलेले आहेत. त्यामुळे विशाखा जजमेंटमधील तरतूदीनुसार निर्गमित शासन निर्णय अधिक्रमित होत असून या अधिनियमातील कलम ४ (१) अंतर्गत कामाच्या ठिकाणी महिलांच्या लैंगिक छळाच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी "अंतर्गत तक्रार समिती" बरोबरच कलम ६ (१) अंतर्गत जिल्हा स्तरावर "स्थानिक तक्रार समिती" गठित करण्याची तरतूद आहे. सदर अधिनियमा अंतर्गत दिलेली कार्ये पार पाडण्यासाठी प्रत्येक जिल्हयाकरिता -जिल्हा अधिकारी॰(District Officer) म्हणून जिल्हा दंडाधिकारी/ अतिरिक्त जिल्हा दंडाधिकारी/ जिल्हाधिकारी / उप जिल्हाधिकारी यापैकी एका अधिका-याला प्राधिकृत करण्याची तरतूद आहे. त्यानुसार या अधिनियमान्वये निश्चित केलेली कर्तव्ये/ कार्ये पार पाडण्यासाठी जिल्हा अधिकारी (District Officer) यांची नियुक्ती करणे व स्थानिक तक्रार समिती गठीत करण्याचे प्रस्तावित होते.

**शासन निर्णय :-**

कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम २०१३ व नियम दि. ९.१२.२०१३ अंतर्गत या अधिनियमात नमूद केलेली कार्ये पार पाडण्यासाठी प्रत्येक जिल्हयाचे उपजिल्हाधिकारी यांना या अधिनियमाच्या अंमलबजावणी अंतर्गत जिल्हा अधिकारी (District Officer) म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. या अधिनियमानुसार स्थानिक तक्रार समिती गठित करण्याचे पूर्ण अधिकार प्रत्येक जिल्हयाचे नियुक्त जिल्हा अधिकारी (District Officer) या नात्याने प्रत्येक जिल्हयातील उप जिल्हाधिकारी यांना राहतील. ज्या कार्यालयात १० हून कमी कर्मचारी आहेत किंवा जेथे नियुक्ती प्राधिकाऱ्यांविरुध्द तक्रारी आहेत, अशा कार्यालयातील लैंगिक छळाच्य तक्रारी स्थानिक तक्रार समितीकडे कराव्यात . तसेच प्रत्येक जिल्हयातील जिल्हा अधिकारी (District Officer) म्हणजेच उप जिल्हाधिकारी यांनी ग्रामिण किंवा आदिवासी क्षेत्रासाठी प्रत्येक गट, तालुका व तहसिल मध्ये आणि नागरी क्षेत्रातील प्रभाग किंवा नगरपालिका मध्ये , एका समन्वयक अधिकाऱ्याची निवड करावी, आणि सदर समन्वय अधिकारी त्यांच्या कार्यक्षेत्रातील लैंगिक छळाच्या तक्रारी प्राप्त करुन त्या संबंधित स्थानिक तक्रार समितीकडे ७ दिवसाच्या आत पाठवतील.

३. **जिल्हा अधिकारी** (District Officer) यांनी त्यांच्या जिल्हयाच्या जिल्हाधिकाऱ्यांच्या सहाय्याने स्थानिक तक्रार समितीमधील अध्यक्ष व सदस्यांची नियुक्ती करावी. सदर जिल्हा स्तरावरील स्थानिक तक्रार समितीची रचना खालीलप्रमाणे राहिल.

अ) अध्यक्ष- सामाजिक कार्याचा ५ वर्षाचा अनुभव असलेल्या आणि महिलांच्या सोयीसाठी बांधील असलेल्या महिलांमधून नामनिर्देशिनाने अध्यक्षांची नियुक्ती करावी.

ब) एक सदस्य- जिल्हयातील गट/ तालुका/ तहसील/ प्रभाग/ नगरपालिका या कार्यालयामध्ये काम करणाऱ्या महिलांमधून एक सदस्य नामनिर्देशित करण्यात यावा.

क) दोन सदस्य- महिलांच्या सोयीसाठी बांधील असलेल्या अशा अशासकीय संघटना/ संघ किंवा लैंगिक छळाच्या प्रश्नांशी परिचित असलेली व्यक्ती यांमधून दोन सदस्य नामनिर्देशित करावेत, त्यांच्यापैकी किमान एक सदस्य महिला असावी.

I) परंतु, त्यापैकी किमान एका नामनिर्देशित सदस्याची पार्श्वभूमी प्राधान्यांने कायद्याची (Legal) असावी.

II) तसेच त्यापैकी किमान एक नामनिर्देशित सदस्य अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती किंवा इतर मागासवर्ग किंवा अल्पसंख्यांक समाजातील महिला असावी.

ड) सदस्य सचिव- जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी हे सदर समितीचे पदसिध्द सदस्य असतील.

४. स्थानिक तक्रार समितीमधील अध्यक्ष व सदस्य यांच्या नियुक्तीचा कालावधी तीन वर्षापेक्षा अधिक नसेल.

५. स्थानिक तक्रार समितीचे अध्यक्ष किंवा कोणतही सदस्य हे या अधिनियमाच्या कलम १६ मधील तरतूदींचे उल्लंघन करीत असतील किंवा अपराधासाठी दोषी ठरविले असतील किंवा त्या त्या वेळी अंमलात असलेल्या कोणत्याही कायद्यान्वये त्याच्या विरुध्द अपराधाची चौकशी प्रलंबित असेल किंवा ते कोणत्याही शिस्तभंगाच्या कारवाईमध्ये दोषी असल्याचे आढळून आले असतील किंवा त्याचे विरुध्द शिस्तभंगाची कारवाई प्रलंबित असेल किंवा अशा रितीने त्याने पदावर राहून सार्वजनिक हितास बाधा पोहोचवून त्याच्या पदाचा दुरुपयोग केला असेल, अशा अध्यक्ष किंवा सदस्य यांना सदर पदावरून दूर करण्यात येईल. आणि अशा रितीने रिक्त झालेले पद किंवा कोणत्याही नैमित्तिक कारणाने रिक्त झालेले पद या कलमाच्या तरतूदीनुसार जिल्हा अधिकारी (District Officer) यांना नव्याने नामनिर्देशन करुन भरता येईल.

६. कामाच्या ठिकाणी झालेल्या लैंगिक छळाच्या तक्रारींची चौकशी/ चौकशी अहवालावरील कार्यवाही, "कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम २०१३ व नियम दि. ९.१२.२०१३" यामध्ये विहीत केलेल्या तरतुदीनुसार करण्यात यावी.

७. सदर अधिनियमांतर्गत चौकशी करुन सादर केलेल्या अहवालाच्या आधारे नियुक्ती प्रधिकाऱ्यांनी दिलेल्या शिक्षेविरुध्द कोणत्याही पिडीत व्यक्तीस उक्त अधिनियामाच्या कलम १८ मधील तरतूदीनुसार ९० दिवसांच्या आत अपील करता येईल.

८. अंतर्गत तक्रार समितीने व जिल्हा स्तरावरील प्रत्येक स्थानिक तक्रार समितीने त्यांचा वार्षिक अहवाल विहित नमुन्यात जिल्हा अधिकारी यांना सादर करावा व जिल्हा अधिकारी यांनी सदर अहवालावरील संक्षिप्त अहवाल महिला व बाल विकास विभागास प्रत्येक वर्षाच्या ३० एप्रिल पुर्वी सादर करावा.

९. उक्त अधिनियमाच्या कलम २३ मधील तरतूदीनुसार सदर अधिनियमांच्या अमंलबजावणीच्या अनुषगांने सनियंत्राणाबाबतचे आदेश स्वंतत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

१०. प्रत्येक जिल्हा अधिकारी (District Officer) यांनी या अधिनियमामधील तरतुदीनुसार लैंगिक छळास प्रतिबंध करणे, निवारण करणे , कार्यालयात सुरक्षितेचे वातावरण निर्मितीच्या अनुषंगाने जागृती निर्माण करण्यासाठी कार्याशाळा आयोजित कराव्यात. तसेच समितीच्या सदस्यांच्या नावांचा फलक प्रत्येक कार्यालयात दर्शनी ठिकाणी लावावा..

११. सदर शासन निर्णय महसूल व विभागाच्या मान्यतेने व अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४३/ई-२ दिनांक १/९/२०१४ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१६१२२१०८१०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uke Ujjwal

Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2014.09.17 17:00:27 +05'30'

**उज्ज्वल ऊके**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधानपरिषद
६. सर्व मा.संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/ विधानपरिषद सदस्य
७. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, यांचे कार्यालय, मुंबई
११.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ पोलीस महानिरीक्षक
१२.आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय, पुणे
१३.सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास विभाग
१४.सदस्य सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
१५.सचिव, निवडणूक आयोग, मुंबई
१६.सर्व जिल्हाधिकारी/ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१७.सर्व महानगरपालिका आयुक्त
१८. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१९.सर्व तहसिलदार
२०.सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग,
२१.निवड नस्ती, मकक